**रा.प.धुळे विभागातील धुळे आगाराच्या आवारात विद्युत प्रणालीवर चालणाऱ्या बसेसकरीता विद्युत चार्जींग स्टेशन उभारण्याच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एसटीसी-०६२४/प्र.क्र.७८/परि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २२ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :-**

उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. यांचे पत्र क्र.राप/स्थाअ/विद्युत/२१९७, दि.१५.०५.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळातील रा.प.धुळे विभागातील धुळे आगाराच्या आवारात विद्युत प्रणालीवर चालणाऱ्या बसेस करीता विद्युत चार्जींग स्टेशन उभारणेसाठी रु.८,५१,७३,११२/- कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

रा.प.धुळे विभागातील धुळे आगाराच्या आवारात विद्युत प्रणालीवरील चालणाऱ्या बसेसकरीता विद्युत चार्जींग स्टेशन उभारणेसाठी रु.८,५१,७३,११२/- (अक्षरी रुपये आठ कोटी एक्कवन्न लाख त्र्याहत्तर हजार एकशे बारा फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींची पुर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(अ)काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
(आ)ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
(इ)सदर कामासाठी संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.
(ई)प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र. १७७/ ता.क. १, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
(उ)सदर कामाचा खर्च गृह विभागाच्या उपलब्ध असलेल्या नियत व्ययामधून करण्यात येईल.
(ऊ)सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र. बिडीजी-२०१७/ प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७.०७.२०१७.

२. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.बी-३, ३०५५ मार्ग परिवहन ००-१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपकामांना सहाय्य (००) (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ बसस्थानकांचे आधुनिकीकरणांतर्गत बांधकाम व इतर सोयी सुविधा (३०५५ ००५२) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मिती करिता अनुदान" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत परिच्छेदाखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारमधील परिच्छेद क्र.१३४(१), १३४(२) आणि १३४(३) मधील वित्तीय अधिकारांच्या वित्तीय मर्यादा व अटीमध्ये सुधारणा करण्याबाबतचा वित्त विभाग, शासन निर्णय दि.२०.०९.२०१९ मधील अ.क्र.१. परिच्छेद क्र. १३४(१) अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८२२१६५२२४७५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAYSEN JAYPRAKASH INGOLE

Digitally signed by JAYSEN JAYPRAKASH INGOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=fac1868a3a3bc62404072a90fb604cfa54cc0c6b396bbe9f862cb814602e0bfd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7C9E48AC69F313DEECCD6E9EECEEA57A822C9D8CCACD64DD1C5031B045E7C1F2, cn=JAYSEN JAYPRAKASH INGOLE
Date: 2024.08.22 17:07:52 +05'30'

**( जयसेन इंगोले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
५) मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
७) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
८) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
१०) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१२) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१३) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१४) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
१५) कक्ष अधिकारी (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती कार्यासन परि-१, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.